२०२१०९२११८२२३९३०१७

प्लेग नियंत्रण पथकातील ३ अस्थायी पदे
पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्लेग-२०२०/प्र.क्र.२४१/आ-५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीखः २६ ऑगस्ट,२०२१

वाचा:

१) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांक पदआ-२००७/प्र.क्र.११७/सेवा-१, दि. ६/८/२००७
२) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांकः हिनिका-२०१२/अपदे/प्र.क्र.१६६/आ-५, दि.३०/०४/२०१२.
३) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांकः प्लेग २०२०/अपदे/प्र.क्र.२४१/आ-५, दि. १६/०३/२०२१
४) वित्त विभाग, शा.नि. क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. १०/०८/२०२१
५) संचालक, आरोग्य सेवा,पुणे यांचे पत्र क्र.संआसे/राहिनिका/अस्थायीपदे/चालूठेवणेबाबत/ १५१८५-८७/२०२१ दि.०३.०८.२०२१.

प्रस्तावना :

महाराष्ट्रात १९५३ पासून प्लेगचे रुग्ण आढळून आले नसल्यामुळे दिनांक २६ नोव्हेंबर, १९८७ च्या शासन निर्णयानुसार प्लेग सर्वेक्षण पथक बंद करण्यात आले होते. तथापि, राज्यात बीड जिल्ह्यातील मामला गावामध्ये ऑगस्ट/सप्टेंबर, १९९४ मध्ये संशयित प्लेग आढळून आला होता. राज्यातील सर्व जिल्ह्यात एकूण ६३४ रुग्णांचे रक्तजलनमुने प्लेगसाठी दुषित आढळून आले होते. म्हणून ३ ऑक्टोबर, १९९४ मध्ये प्लेग नियंत्रण पथक पुनःश्च स्थापन करण्यात आले. त्यानंतर राज्यात अद्याप प्लेगचा एकही रुग्ण आढळून आलेला नाही. तथापि, खबरदारीचा उपाय म्हणून प्लेग पथकामार्फत बीड, लातूर, उस्मानाबाद, पुणे, सातारा, सोलापूर या जिल्ह्यात उंदीर व पिसवा यांची तपासणी नियमित करण्यात येत आहे. सदर पथकासाठी एकूण १७ पदे मंजूर असून त्यापैकी १४ पदे ही स्थायी झाली आहेत व ३ पदे ही अस्थायी आहेत. प्लेग नियंत्रण कार्यक्रमांतील या ३ अस्थाई पदांना संदर्भाधिन दिनांक१६.०३.२०२१ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०२१ ते ३१.०८.२०२१ पर्यंत मुद्तवाढ देण्यात आली होती. या ३ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासननिर्णयः

प्लेग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत प्लेग नियंत्रण पथक (बीड, लातूर, उस्मानाबाद, पुणे, सातारा व सोलापूर यांच्यासाठी) एकूण १७ पदे मंजूर आहेत. या पथकातील खालील नमूद ३ अस्थायी पदे आरोग्य विषयक सेवा सातत्याने उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने आवश्यक असल्याने सदरच्या ३ अस्थायी पदांना दिनांक ०१.०९.२०२१ ते दिनांक २८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये सुधारित आकृतीबंध मंजूर करून घेण्याच्या अटीच्या अधिन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कार्यालयीन नाव | मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे व पदनाम | ६व्या वेतन आयोगानूसार वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|
| १ | प्लेग नियंत्रण पथक (बीड, लातूर, उस्मानाबाद, पुणे, सातारा व सोलापूर) | १७ | १४ | ३<br>मजदूर (मुख्यालय) | ४४४०-७४४०<br>ग्रेड पे १३०० |

२. या पदांवरील खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षातून सन२०२१-२२ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर-१
२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
०६-सार्वजनिक आरोग्य,
१०१-रोग प्रतिबंधक व नियंत्रण,
(०१)(०४) प्लेग नियंत्रण कार्यक्रम, (राज्यक्षेत्र)
सांकेतांक (२२१० ०६०२) योजनेतर

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ. पु.क., दिनांक १०/०८/२०२१ अन्वये विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRANKUMAR VASANTRAO WAHUL

Digitally signed by KIRANKUMAR VASANTRAO WAHUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc9db72365b55a7409cd8ad3c479621cc9f4985e6d1be8dd4cd1c4fdab3cbb14, pseudonym=5AD6BC99C173E8D779171190F8192DAE8D5E1557, serialNumber=2E35734EC976BF5657815FB42C4D25B0B3C23B4C69600638F3DEB172AC9E37F4, cn=KIRANKUMAR VASANTRAO WAHUL
Date: 2021.08.26 18:28:56 +05'30'

**(किरण वाहुळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई/पुणे.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा (हि. ह. व ज. रो), पुणे.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ व (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग, व्यय-१३, अर्थसंकल्प-३, अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सार्वजनिक आरोग्य विभाग, (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई .
९. निवडनस्ती (आरोग्य - ५).